**अस्थायी पदांना मुदतवाढ देण्यासाठी प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क.**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०७ सप्टेंबर, २०१८

वाचा -

१. शासन निर्णय क्रमांकः असंक-१००४/प्र.क्र. १२ (भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.०४.१०.२००४.
२. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/ आपुक, दि.११.०२.२०१६.
३. शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आपुक -१, दि.०३.१०.२०१७.
४. शासन निर्णय शुद्धीपत्रक क्रमांकः पदनि- २०१६ /प्र.क्र.८/१६/ आपुक -१, दि.१७.१०.२०१७
५. शासन निर्णय क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र.८ /१६/आ.पु.क.दि. ०५.०३.२०१८

प्रस्तावना -

वित्त विभागाच्या वरील संदर्भ क्र.५ येथील दि.०५.०३.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार, सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले होते. तथापि, सर्व प्रशासकीय विभागांची सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याबाबतची कार्यवाही अद्याप पूर्ण झालेली नाही. ही बाब विचारात घेऊन, शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय -

**सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि. २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.**

सदर कालावधीमध्ये, सर्व प्रशासकीय विभागांनी, कोणत्याही परिस्थितीत त्यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेऊन, सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे. यानंतर सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची सर्व विभागांनी नोंद घ्यावी. सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या (खुद्द) आस्थापनेवरील पदांचा तसेच, त्यांच्या

नियंत्रणाखालील क्षेत्रिय कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा आढावा घेऊन, सुधारित आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करण्याचे नियोजन करुन त्वरित कार्यवाही करण्याच्या सूचना संबंधित अधिकाऱ्यांना द्याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०७१५३५३७२६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Ramdas Petkar

Digitally signed by Ravindra Ramdas Petkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7faa8a0fe5f84a3356eee5e28943030f4417521c2e4121efd5e2b39c2eae27ce, serialNumber=93d05a1f2a6cead3ed9e358a4d06e909b2a25fe9a918a443e6204cd5d72b0ed9, cn=Ravindra Ramdas Petkar
Date: 2018.09.07 15:39:29 +05'30'

**(र.रा.पेटकर)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. सर्व विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. सर्व सहसचिव/उपसचिव,वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
६. मंत्रालयाच्या सर्व विभागाखाली विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख.
७. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
८. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१०. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
११. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१२. परिवहन आयुक्त महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११०००१.
१४. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
१५. सर्व विभागीय आयुक्त.
१६. सर्व जिल्हाधिकारी.
१७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१८. सर्व जिल्हा परिषदाचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मुंबई.
२०. प्रधान महालेखापाल-१(लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.

२१. प्रधान महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
२२. महालेखापाल-२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
२३. महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
२४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२५. संचालक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
२६. सह संचालक (सुधारणा), लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
२७. सह संचालक, लेखा व कोषागारे, नवी मुंबई / पुणे / नाशिक / औरगांबाद / नागपूर / अमरावती.
२८. सह संचालक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / नागपूर / अमरावती.
२९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३०. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३१. सर्व उप कोषागार अधिकारी.
३२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
३३. सर्व लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद.
३४. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (कार्या हाऊसिंग सेल १९ सी),मंत्रालय, मुंबई.
३५. सर्व राजकीय पक्षांची कार्यालये
३६. वित्त विभागातील सर्व कार्यासने.
३७. निवड नस्ती, आकृतीबंध पुनर्रचना कक्ष.